ई-साहित्य प्रतिष्ठान दि. १४ मे २०१०

# ईस्टाप

संपादिका

रेणूका रेपाळ-खटावकर (अमेरिका )

सुप्रिया जोशी-जाधव (पुणे )




आपल्या प्रतिक्रिया आम्हाला जरूर कळवा esahity@gmail.com

**आ.......हा..........!!!!!!!**

वैशाख़वणव्याच्या  काहिलीने हैराण झालेल्या मनाला दिलासा देण्यासाठी हलक्या-फुलक्या
विनोदी कवितांची ही ई-झुळुक प्रत्येकाच्या दारातं हास्याचा गुलमोहोर नक्कीचं बहरवेल
" ई - स्टाप" च्या या भन्नाट  विनोदी अकांने!!!!..........
तर सादर  करीत आहोतत्त्त्त्त्त.....

# "नवराआआआआआआआआआ - बायकोओओओओओओओ"

हा विषय  'तसा' नाजूकचं! पण 'अस्सा' महायुध्दापेक्षा डेंजर!! हा अंक , तुम्ही जर 'नवरा' असाल तर 'हीच्या' सोबत आणि जर 'बायको' असाल तर तुमच्या 'ह्यांच्या' सोबत वाचू नका.  आणि जर......आणि जर वाचलातच  तर कम्प्युटर वा लॅप्टॉप या सारख्या तत्सम् गोष्टींवर दया करा.......
खरंतर झाकली  मुठ सव्वालाखाची !( तुमची अन आमचीही )
चला तर मग.....ही लाख़ामोलाची 'रेशीम(?)गाठ' हसत-ख़ेळत उकलत
जाऊयात.........नाहीतर गुंता व्हायचा(?) नव्हे वाढायचा.....
आणि हो, अंक  कसा वाट्ला हे कळवायला विसरु नका, आणि खूप्प्प्प्प्पच आवडला तर मस्तपैकी मेल करा
मग आम्ही  "नवराआआ बायकोओओ रिट्र्न्स....."  अस्सा अंक काढायला अजिबात मागे-पुढे पहाणार नाही.....
(आजूबाजूला पाहूनच बोलतेय.....)

असो! तुम्ही लग्न कोणत्याही पध्दतीने करा,  ठरवून, प्रेम-विवाह, पत्रिका पाहून.........
अगदी कस्सेही करा........पुढचे पाढे कोणाला चुकले नाहीत.........

## तो अर्ज किया है..................

’छत्तीस गुण’ जमले तरी.........
’छत्तीस गुण’ जमले तरी..................
मनं मात्र जुळत नसतात,
नवरे नावाचे शनी
काही केल्या टळत नसतात.....
.
.
.
सर्वच चारोळया गंभीरपणे घ्यायच्या नसतात!

-रेणुका ख़टावकर (रेपाळ).



इतरवेळी नाही परंतु संकटकाळी मात्र भल्याभल्यांना मंत्र, आरत्या, देव नक्कीचं आठ्वतो .
तसाही ........जगी सर्व सुख़ी असा कोण (नवरा) आहे ?.....अ? पण येणा-या संकटाची धार बोथट करण्यासाठी बायकोश्वरीची आराधना प्रारंभीच आरंभीली तर ????

## !!! जय बायकोश्वरी !!!

जयदेवी जयदेवी जय बायकोश्वरी जय बायकोश्वरी !!
नव-याजातीचा तू उध्दार करी !!
जयदेवी जयदेवी!!

सा-या जगात तुजसम कोणी नाही
आवाजाने तव दिशा दणदणती दाही !!
जयदेवी जयदेवी!!

घरीदारी सत्ता सर्व तुझी चाले
धाकास्तव नवरा लाकडे चुलीत घाले !!
जयदेवी जयदेवी!!

घरासी नवरा येता आपटतसे पाय
गरीब बीचारा तो हरला निरुपाय !!
जयदेवी जयदेवी!!

झोपण्यापूर्वी म्हणे अंथरुण तुम्हीचं टाका
नाहितर मिळणार नाही झोपायचा मॊका !!
जयदेवी जयदेवी!!

निजताना आदेश "मुकाट चेपा पाय !"
करील काय बिचारा नसे तरणोपाय !!
जयदेवी जयदेवी!!

अशी वदावी किती तुझी ही गाथा
"जोरुका गुलाम" चरणी झुकवीतो माथा !!
जयदेवी जयदेवी!!

**-अरुण खराटे.**

लग्नाच्या  गाठी  या स्वर्गातचं बांधलेल्या असतात म्हणे!
(कसचं काय........पदरी पडलं अन पवित्र झालं!)
पण प्रत्यक्षात एकमेकांशी 'गाठचं ' पडल्यावर दोघांच्या अपेक्षांची,स्वप्नांची कशी वाताहत होते.........
पहा तर खरं..............



## लग्नाच्या गाठी

जन्मोजन्मीचं वैर काढत
तो दिवसरात्र तिच्याशी भांडत असतो
कोण म्हणतो लग्नाच्या गाठी
देव स्वर्गात बांधत असतो

लग्नापूर्वीचे गुलाबी दिवस
लग्नानंतर रहात नाही
एकदा लग्न लावून दिलं की
देवसुध्दा खाली पहात नाही

मग लग्नापूर्वीचा तो हुशार नवरा
तिला भलताचं चक्रम वाटायला लागतो
......आणि हळुहळू तिच्या चेह-यावरचा
प्रेमळ मुख़वटा फ़ाटायला लागतो

आपला नवरा बैल आहे
असं प्रत्येक बाईला वाटत असतं
त्याच्या त-हेवाईक वागण्याचं दुःख
तिच्या मनात दाटत असतं

तो कधी कसा वागेल
ह्याची जरासुध्दा खात्री नसते
नको तेच नेमकं बोलून जाईल
जे बोलायचं त्याला कात्री असते

मग जमेल तिथं, जमेल तेव्हा, जमेल तितकं
ती त्याला बोलत बसते
त्याच्या तेही डोक्यावरुन जातं
पण ह्या नंदीबैलाची मान डोलत असते

त्याचा तो गबाळा अवतार
तिला निटनेटकं रहायाचं असतं
तिला चार दिवस सासूचे
त्याला 'स्पोर्टस चॅनल' पहायचं असतं

लहान मोठ्या चाकाचा  हा संसाराचा रथ
पळत कसला, रांगत असतो
कोण म्हणतो लग्नाच्या गाठी
देव स्वर्गात बांधत असतो

ती तरी थोडी त्याच्या सारख़ी असेल
असं प्रत्यक्षात घडत नाही
त्याच्या स्वप्नांचे पंख लावून
ती त्याच्या आकाशात उडत नाही

तो गच्चीत तिला घेऊन जातो
इंद्रधनुष्यावर चालायला
ती सोबत पापड कुरवड्या घेते
गच्चीत वाळत घालायला

त्याच्या  डोळ्यात क्षितीजावरची
लख़लख़ती शुक्राची चांदणी असते
हिच्या डोक्यात गोडा मसाला
आणि  वर्षभराची भाजणी असते

प्रेमात रंगून, नशेत झिंगून
ख़ूपस जवळ, काहीसं लांबून
थोडीशी घाई, थोडसं थांबून
पौर्णिमेचा चंद्र त्याला
तिच्या केसात माळायाचा असतो
.......आणि त्याच वेळेस तिला मोरी धुवायाची
किंवा संडास घासायचा असतो.

आपली बायको म्हैस आहे
असं हा रेडा सगळ्यांना सांगत बसतो
कोण म्हणतो लग्नाच्या  गाठी
देव स्वर्गात बांधत असतो.

**-धुंद रवी.**

आणि अश्शी गाठ पडल्यावर सुरु होतं "तू- तू, मै- मै.........."

पिढ्यानपिढ्या चालत आलेल्या ह्या पुरुषप्रधान  संस्कृतीत.....सदोदित नवरोबांचाचं वरचष्मा असला तरीही त्याच्याचं वेंधळेपणाचे किस्सेही काही कमी श्रवणीय नाहीत!

अनभवूयात त्यातले काही............

.... .. . **या पुरुषांना काही म्हणजे काहीचं कळत नाही.**

बाहेर जाताना नेहमी पाकीट घरीचं विसरणार
अर्धा रस्ता ओलांडल्यावरचं त्यांच्या लक्षात येणार
गाडीतले डिझेल असतेचं फुक्कट वाया  घालवायला
नेमके  डिझेल महागते आम्ही  घेतली जर चालवायला
जर थांबले हे घरात एक  वस्तू जागेवर सापडणार नाही .... .. . या पुरुषांना काही म्हणजे काहीचं कळत नाही.

गोंधळलेले कायम कधीही बायकोला ताई म्हणतील
स्वतःहाच्याच विनोदावर  एकटेचं  मग हसतील
चष्मा लावतात डोक्यावर आणि घरभर शोधत बसतात
शेवटी चष्म्याशिवायचं मग वर्तमानपत्र वाचतातं
क्रिकेटच्या सामन्यापुढे यांना काहीच दिसत नाही    .... .. .   या पुरुषांना काही म्हणजे काहीचं कळत नाही.

ऑफ़िसशिवाय यांना दुसरे काहिचं नाही सुचत
बायको कितीही सुंदर असली तरीही ह्यांना नाही रुचत
बॅचलर्स पार्टीसाठी यांच्याकडे बरोब्बर वेळ असतो
ध्यान कसेही असले तरी तोरा शहारुख़चा असतो
ट्राउझर आणि टायचं कॉम्बिनेशन जमत नाही     .... .. .   या पुरुषांना काही म्हणजे काहीचं कळत नाही.

**- प्रिया गवई.**



बायकांना नव-यांचं काही पटत नसतं. आणि माहेरचं वेड काही सुटत नसतं.
माहेरच्या म्हशीचही कोण  कौतुक असतं त्यांना...

**“माझ्या माहेराच्या वाटे**
**जरी आले पायी फ़ोड.....**
**पाय चालले चालले**
**अशी माहेराची  ओढ......”**

तर अश्या या माहेरच्या  ओढीपुढे नवराच काय पण यमानेही हात टेकले हो!......(शेवटी
तोही कुणाचातरी नवराचं ना ? )

# बायको आणि यम !!

काय सांगू त्या दिवशी अचानक ती चमत्कारीक एक घडी आली
"माझ्या दादानं दिलेलं पेंटिंग भिंतीवर लावू" अशी हीला दुर्बुध्दी झाली !

रविवारच्या दुपारी स्टुलावर चढून भिंतित खिळे ठोकणं कोणाला आवडतय?
पण बायकोने दिलेल्या हुकुमापुढे शेवटी कोणाचं काय चालतयं?

आता नशिबही बेकार... चढताच ते लुकतुकं स्टूल एकदम कोलमडलं
आणि पड्ता पड्ताच आमचं टाळकं डायनिंग टेबलावर टण्णकन आपटलं!

डोळ्यापुढे एकदम अंधारी आली... काय होतय हे काही केल्या कळेना
काही वेळाने उजेड झाला पण आसपासचा वावर काही घरासारखा वाटेना

समोर एक मोठ्ठी मिशीवाला बसून उगिचच मोठ-मोठ्याने हसत होता...
त्याच्या शेजारी एक मस्तवाल रेडा मजेत ताजे-ताजे गवत चरत होता!

मी विचारलं... " भइय्या तबलेमेसे म्हशी पळनेसे तू वेडा हो गया काय रे?"
तो गरजला... "अरे तू मरुन यमपुरीत आलास अजून हे कळालं नाय रे?"

“मी तर स्टूलावरुन पडलो होतो” हे सांगताना माझा रोम-रोम कळवळला
मात्र हे एकून तो देखिल जरासा गोंधळला आणि दूतांवर एकदम ओरडला!

तो गरजला... “ एन्ट्री चेक करा, हा आहे का पुलावरुन पडलेला जगन?”
भेदरलेला दूत म्हणाला... “नाही... , हा तर स्टुलावरुन पड्लेला बबन!!!”

यम म्हणाला... “ अरे कित्ती-कित्ती सहन करावा तुमचा केअरलेसनेस्स?”
याला परत पाठवावं लागणार, सत्यवानानंतर ही दुसरी “फ़ेल्युअर केस!!!”

परत थोडा अंधार झाला आणि क्षणात मी घरात... समोर ही उभी ठाकली
तुमचा विश्वास बसणार नाही पण त्या वेळी ती यमापेक्षा “फुल्टू डेंजर” वाटली!

मी तिला म्हणालो, “अगं मी यमपुरीत जाऊन आलो, तुझा विश्वासच बसणार नाही”
ती... “पेंटींग मोडलत!! आई खरच म्हणते की याला कुठ्ठे-कुठ्ठे उभा करणार नाहीत

माझी आई खरच म्हणते की याला कुठ्ठे-कुठ्ठे उभा करणार नाहीत...
याला कुठ्ठे-कुठ्ठे उभा करणार नाहीत...

**--चंद्रजीत कांचन**

यमही थिटा पडला...

जगाच्या  पाठीवर कुठही   कुणाचही वर्चस्व असो.......त्यात कितीही  उलथापालथ होवो
घरातील एकतंत्री कारभार मात्र  गृहमंत्र्यांकडेच हो ! हो...... हो ......अगदी सगळी खाती !!
( घाबरु नका नव-यांनो ..........नामधारीचं बर का ! )

## घरगुती बजेट

म्हणायला द्वितंत्री कारभार,
तसा तो एकतंत्री असतो
घरोघरी गृहमंत्री हाच
पदसिध्द अर्थमंत्री असतो

गृहमंत्र्याच्या हातातच
अर्थमंत्र्याच्या नाड्या असतात
ज्यांना हे जमत  नाही
त्या बिचा-या वेड्या असतात

घरगुती  बजेट्चा  अंदाज तरी
सांगा कुठे रास्त असतो?
आपत्कालीन खर्चच
बजेट् पेक्षा जास्त असतो

**-सुर्यकांत डोळसे.**



अशा गृहमंत्र्याने काय काय म्हणून  आणि कित्ती अन्याय सहन करायचा? चक्क घोरणं सोसायचं?
नवरोजींच्या घोरण्यावर  जेवढ्या म्हणून कोट्या कराव्यात तेवढ्या अपु-याचं पडतील......
तसा घोरणे हा विषय ब-याचं घटस्फ़ोटांचं  गुपितही असू शकेल......
तर नव-यांनो सावधान !!!



## आमचे 'हे ' रात्री अस्स्स्स्स्स्स्स्से घोरतात

चोरी, दरोडे पड्तात शेजारच्या  घरी
आमच्या घरापासून चोर लांबच रहातात
अहो, पहारेकरी नाही काही दारी
आमचे हेच चोरांना पळवून लावतात

हत्यारांविना ते अशी करामत करतात
काहीच न करता, घरा उपयोगी पडतात

सांगताना बाई लाज वाटते पण
आमचे 'हे ' रात्री अस्स्स्स्स्स्स्स्से घोरतात
अस्स्से घोरतात हो  अस्स्से घोरतात

जसे तोफ़ांतून दारुगोळे सुस्साट सुटतात
की चोर जीव घेऊन पळतच सुटतात
पळतच सुटतात हो धुम्म पळत सुटतात
आमचे 'हे ' रात्री अस्स्स्स्स्स्स्स्से घोरतात

रातराणी फुलते मागच्या अंगणी
चंद्र चांदण्यांचे झिम्मा फुगडी गुंजतात
अहो, छळायला नसतं कुणी  एकांती
आमचे हेच युध्दाची तुतारी फुंकतात

चढत्या रातींची  नशा उतरवतात
काहीच न करता मला उपयोगी नसतात

सांगताना बाई लाज वाटते पण
आमचे 'हे ' रात्री अस्स्स्स्स्स्स्स्से घोरतात
अस्स्से घोरतात हो  अस्स्से घोरतात

वैदूचे अंगारे, डॉक्टरचे फ़वारे सारेच फ़सतात
सारेच फ़सतात हो सारेच फ़सतात

आमचे 'हे ' रात्री अस्स्स्स्स्स्स्स्से घोरतात
घोरतच रहातात हो घोरतच रहातात
घर्र्र्र छर्र्र घर्र र घर्र्र्र छर्र्र घर्र र

**-स्वप्ना कोल्हे.**



पत्नी :- माहीत आहे मी तुझ्या बरोबर लग्न का केले?

पती :- का ?

पत्नी :- तु किती मुर्ख आहेत हे जाणुन घेण्यासाठी.

पती :- त्याच्यासाठी लग्न करायची काय गरज होती ? हे तर तु अस जाणुन घेतल असतस,
जेव्हा मी तुझ्याशी लग्न करण्याची पसंती दर्शविली होती.

==================================================================

*आता बोला, आहे काही उत्तर? पण, हे म्हणजे अतीच झालं हं. आता नवरे लोक म्हणे मनात घोरायला लागलेत!*

*ये नाइन्साफ़ी नही चलेगी...नही चलेगी...नही चलेगी....*

*बायकोला न घाबरणारा (तसा सोयीस्कर आव न आणणारा ) नवरा त्रिलोकात मिळणे दुरापास्तचं!*

*बघातरी पडताळून आपण (आपल्या स्वतःच्या ) बायकोला खरचं किती घाबरता ते .......*

# तुम्ही बायकोला घाबरता ना?

बायकोने सांगितलेलं सगळं काम निमुट्पणे करता  ना?
अगदी खरं सांगा, तुम्ही तुमच्या बायकोला घाबरता ना?

रविवारी तुम्हाला घराबाहेर मुळीच जायचं नसतं
टीव्ही समोर मैच पहात लोळत पडायचं असतं
तरी सुध्दा बयको बरोबर शौपिंग करत फ़िरता ना?
अगदी खरं सांगा, तुम्ही तुमच्या बायकोला घाबरता ना?

रस्त्यावरची "हिरवळ" तुम्ही जमेल तशी  बघता
स्वातंत्र्याचे एक -दोन क्षण चोरुन चोरुन जगता
बायकोने डोळे वटारताच, सरळ रस्ता धरताच ना?
अगदी खरं सांगा, तुम्ही तुमच्या बायकोला घाबरता ना?

बायको धमकावते आज घोरलात तर तुमची  गय  नाही
*तुमचंही तेच गा-हाणं असतं,* पण सांगायची सोय नाही
बायको घोरत झोपल्यावर, तुम्ही मनामध्ये घोरता ना?
अगदी खरं सांगा, तुम्ही तुमच्या बायकोला घाबरता ना?

बायको चिडते, स्वयंपाक बंद, तुमची भारी होते गोच
चहा, ब्रेड, फ़ारतर भुर्जी, तुमची आपली तेवढीच पोच
मग शेपूट आत घालून, तुम्ही नेहमी सारखं हरता ना?
अगदी खरं सांगा, तुम्ही तुमच्या बायकोला घाबरता ना?

अहो घाबरण्यात काही गैर नाही, घाबरणंही भाग आहे
तुमच्या समजुतीसाठी म्हणू, संसारासाठी त्याग आहे
मनातून बायकोवर चिड्लात तरी, तेवढच प्रेम करता ना?
पण, अगदी खरं सांगा, तुम्ही तुमच्या बायकोला घाबरता ना?

**-आकाश बिरारी**

पती (पत्नी ला) - तु कोण आहेस ?

पत्नी - आता तुम्ही मला पण विसरलात का ?

पती - दारु पिल्यावर माणुस सर्व दु:ख विसरतो.
================================================================

नवरा बायको म्हट्ल की चालायचच, खरोख़रच नवरे बायकांच्या मुठीत कि बायका नव-यांच्या हातातलं बाहुलं ?
या गहन प्रश्नाचं प्रामाणिक ऊत्तर ब्रम्हदेवाचा बाप ईथे अवतरला तरीही गुलदस्त्यातचं राहील.
' व्यक्ती तितक्या प्रकृती !'(नवरा-बायको तितक्या विकृती !) हेचं रास्त......

## नवरोबाच्या तालावर नाचता ना ?

घरातल्या प्रत्येकाच्या सुख़ासाठी आपलं मनं मारता ना ?
अगदी ख़रं सांगा , नवरोबाच्या तालावर नाचता ना ?

रविवारी तुम्हालाही लवकर मुळीचं उठायच नसतं
एक  दिवस तरी आयता चहा.....छोटसं मागणं असतं
'ह्यांच्यासाठी' ख़ास पदार्थाच्या तयारीला लागता ना ?
अगदी ख़रं सांगा , नवरोबाच्या तालावर नाचता ना ?

नवरा फ़र्मावतो...आज सुट्टी...शॉपींग-आऊटींग काही नाही
जेवणानंतर ताणून देईन, नि मग'डे-नाईट' मैच पाहीन
नव-याच घोरणं.....सनईचे सूर.....गोड मानून घेताचं ना ?
अगदी ख़रं सांगा , नवरोबाच्या तालावर नाचता ना ?

नवरोबाची भिरभिरती नजर चरफ़डत तरी साहता ना ?
लग्नाआधीची  'विश्वसुंदरी' नंतर 'घरकी मुर्गी' बनताचं ना ?
तुमचे छंद तुमची आवड , स्वप्नातचं जगून घेता ना ?
अगदी ख़रं सांगा , नवरोबाच्या तालावर नाचता ना ?

अचानक फ़ोन.......त्याला "बैचलर्स" पार्टीचं आमंत्रण.....
आठवड्याची भाजी, कपडे , ईस्त्री, मुलांच्या मागण्या
पै-पाहुण्यांची उस्तवार.....हसतमुख़ाने निस्तरता ना ?
अगदी ख़रं सांगा , नवरोबाच्या तालावर नाचता ना ?

अगं! असं आपल्यासाठी नाचण्यात तसं काही गैर नाही
स्त्री स्वातंत्र्याचे फ़डकवा झेंडे.....त्यागाशिवाय पर्याय नाही
वरवरची धुसफ़ुस......तरीही एकामेकांवर जीव पाख़डता ना ?
अगदी ख़रं सांगा , नवरोबाच्या तालावर नाचता ना ?

**-सुप्रिया (जोशी) जाधव.**

स्थळ -काळ -भाषा असली शुल्लक मापदंड नवरा-बायकोच्या नात्याला लागू पडत नाहीत.
नव-याला बायकोचा जन्म न लाभलयाची खंत .... तर बायकोला नवरा न झाल्याची बोच......
' जावे त्याच्या वंशा ' हेच खरं !!!

## अरे बायको बायको

अरे बायको बायको
लय डोक्याले हा ताप
मले पहातच तिच्या
येतो कपायी संताप

अरे बायको बायको
दिस्याले गरीब गाय
कोपली तं दादल्याचं
काय बी ख़र नायं

अरे बायको बायको
म्हणे मीज की शहानी
कदी नसते मी तं व्हतं
तुमच्या सौंसाराचं पानी

अरे बायको बायको
नही दिसता व्हतो भास
सोंबोर तिले पाहाता
गुदमरे माह्या स्वास

अरे बायको बायको
असली तं असे झंगट
निस्ती दोन दिसं जाता
पडतं मनाले संकट

अरे बायको बायको
देवा पुढे आसं करा
मी व्हईन इची बायको
इले करा मह्या नवरा

**-अरविंद चौधरी .**

काआआआश अस्से झाले असते तर मजा आली असती(अस्से मनात आले ना?),
आपण फ़क्त कवितेतच अशी अदलाबदली करु शकतो.
असो! ए क विनोद वाचा-

पती - धावत- धावत हॉटेल मालकाकडे गेला.

पती - लवकर चला माझी बायको खिडकीतून उडी मारून जीव देणार आहे.

मालक - मग मी काय करू ?

पती - खिडकी उघडत नाही.

==========================================================

हे अस्से असतात नवरेलोक, असो!
पण वेळो-वेळी (केव्हा केव्हा) अवेळी याचा बदला तर घेऊ शकतो.....काय म्हणता?

अल्कोहोलाचे दुषःपरिणाम सर्वश्रूत आहेतच. परंतु हा 'सबक' अ-फ़-ला-तू-न-चं !!!

## देवा ख़रं सांग !

देवा खरं-खरं सांग , कुठला डाव तू या जन्मी साधला ?
अस्सा नवरा नावाचा भोवरा तू माझ्या गळयात बांधला...?

निघालो होतो पार्टीला , म्हणे कोणता घालू सूट ?
रंगा-रुपाची ख़ाणचं जणू , त्यात ऊंची चार फ़ूट.......

घाल म्हंटल हवा तो , सगळयात दिसतोस सारख़ाचं........
काय गोड हसला सांगू ! टोमण्याला बिच्चारा पारख़ाचं!.....

मग केली हेअर स्टाईल , म्हणे कस्सा दिसतो ? ग्रेट ?
पांढरे दोन-चार उपटले , देवा ! २०-२५ तर होते केस.....

तेवढ्यात पार्टीत भेट्ली , ह्याची जूनी मैत्रिण ख़ास......
तिने ओळख़ले , आपण पकलो निदान २-४ तास.....

मैत्रिणींत येऊन विचारले , घेऊ का जरा ड्रींक ?
डोळयानेच रागात पहात म्हटले , लेट मी थिंक .....

समजायचं ते समजला , कोल्ड-ड्रिंक घेतो म्हणाला.....
कोल्ड-ड्रिंकमधे वाईन टाकताना, मी स्वतः पाहिला....

मीही समजायचे ते समजले , संपले वायदे-करार.......
एकदा याला चढली की , टांगा पल्टी घोडे फ़रार........

पण यावेळी आला, नि हातात हात धरला मस्त........
भावूकपणे म्हणे , तू नसतीस तर काय झालं असतं ?

मीही उग़ा म्हंटले , चार चौघात असं बोलायचं नसतं !
"तू नसतीस तर! माझं आयुष्य नंदनवन झाल असतं......"

तेव्हा मी अगदी गप्प राहीले , नि पार्टीत तो हसला......
महिनाभर पेट्रोलरहित गाडी ढकलत तरसा कामाला धाडला.....

त्यानंतर त्याने कधी हसायचं धाडसचं मुळी केलं नाही.....
मीही त्याला हसायला कधी कोणतचं कारण दिलं नाही .

**-रेणुका ख़टावकर (रेपाळ).**

# बिचारा नवरा - काही पेचप्रश्न - काही उत्तरे

कल्पना करा घटना अशी की समीरच्या साखरपुड्याला जाण्याचा दिवस आहे. तुम्ही घाई घाईने ऑफिसातून घरी येता आणि तयार व्हायला लागता, आणि अचानक...

तुमच्या समोर ती, तुमची अर्धांगिनी हो, येते आणि सहज प्रश्न विचारते...
"काय घालू?"
तुम्ही लग्नाच्या नंतरची एक किंवा दोन स्वप्न-आकाश वर्षे पार केलेले नवरे असाल तर तुम्हाला त्या सहज साध्या भोळ्या प्रश्नातली मेख पटकन कळते.

हा प्रश्न नसतो महाराजा महाप्रश्न असतो, या प्रश्नातून तू माझी किती कदर करतोस ते कळले इथपर्यंत गाडी जाऊ शकते.

तर मग तुम्ही काही तरी बात टाळायची म्हणून म्हणाल की साडी घाल की! आणि एका मोठ्या चक्रव्युहात आपण अभिमन्यू प्रमाणे अडकलो आहोत याची तुम्हाला लगेच जाणीव होईल ते पुढच्या प्रश्नात,

"निळी घालू की गुलाबी?"
हा प्रश्न तुम्हाला सोपा वाटेल आणि तुम्ही जर मनातल्या मनात "अकडम बकडम" वगैरे म्हणून आलेला एक रंग जर सांगाल जसे निळी घाल ना तर आणखीन बिकट प्रसंग ओढवून घ्याल.

आता प्रश्न येईल "सुषमाच्या लग्नात मिळालेली निळी घालू की तू मागच्या लग्नाच्या वाढदिवसाला बिग बझार मधून आणून दिली होतीस ती निळी घालू?"

आता बोला!

हा चक्रव्यूह आहे हे तुम्हाला आतापर्यंत नक्कीच पटलेले असणार आणि यातही हिम्मत दाखवून तुम्ही पुढे गेलात आणि म्हणालात की मी दिलेली घाल हो.

तर पुढचा प्रश्न असेल,
"नाहीतर गुलाबीच घालू का?"
घ्या हे आधीच ठरलेले होते तर इतका मोठा प्रश्नप्रपंच का? का? असा भाबडा सवाल तुमचे मन पोखरून टाकेल.

या सगळ्या प्रकरणातून सुटायचं असेल तर जाणकार नवऱ्यांनी कुठेतरी लिहून ठेवल्याचे आठवतेय ते सांगतो.

"काय घालू?" असा पहिला वार होताच लगेच म्हणायचं तुझ्या आवडीच्या दोन साड्या माझ्या समोर ठेव आणि मी एक निवडतो. आपण निवडलेली साडी सोडून त्यापेक्षा दुसऱ्या साडी कडे पाहून तिने त्यापेक्षा ही घालू का विचारतात हो हो कदाचित तीच तुला या क्षणी अधिक खुलून दिसेल असे काही तरी म्हणायचे आणि तशी तू सगळ्याच साड्यांमध्ये कशी गुलछडी दिसते हे म्हणायला विसरायचं नाही बरं. जाणकारांचा हा उपाय मी अजुन करून पाहिलेला नाही पण तो रामबाण आहे असे वाचलेय.

शेवटी काय हो आपण नवरा जातीचे लोक जे वाट्याला येईल ते सहन करायला हळू हळू शिकत असतोच. कारण कोणत्याही जोडप्याच्या कोणत्याही वादात एकच व्यक्ती खरी असते आणि दुसरी व्यक्ती नवरा असते.

[डिस्क्लेमर: मी हा लेख बायको आजुबाजुला नाही याची पुरेपूर खबरदारी घेऊन घेतला आहे तरीही मी जर या पुढे लिहित नाहीसा झालो तर तुम्ही जाणकार लोक काय समजायचे ते समजून घ्यालच. हा लेख वाचताना सर्व नवऱ्यांनी माझ्या नावाने खडे फोडावे (मनात हसावे हो) आणि आपला नवरेपणा पुरेपूर सिद्ध करावा]

-तुषार जोशी, नागपूर

पत्नी :-पुढच्या जन्मी तुम्हाला काय व्हायला आवडेल ?

पती :- झुरळ.

पत्नी :- झुरळ ?.... ते का ?

पती :- कारण तु फक्त झुरळालाच घाबरतेस.

==========================================================

